/

वैधानिक विकास मंडळांच्या कामकाजासंबंधात नियोजन विभागामध्ये कक्ष स्थापन करण्याबाबत .....

महाराष्ट्र शासन,
नियोजन विभाग,

शासन निर्णय क्रमांक: वैविमं-१०९४/प्र. १२७/का-१४५२,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : ६ डिसेंबर, १९९४.

वाचा :- [१] शासन निर्णय, नि. वि. क्र. वैविमं-१०९४/प्र. ३९/का-१४५२, दिनांक ७ जुलै, १९९४.
[२] शासन निर्णय, नि. वि. क्र. वैविमं-१०९४/प्र. ३८/का-१४५२, दिनांक ४ ऑगस्ट, १९९४.
[३] शासन निर्णय, नि. वि. क्र. वैविमं-१०९४/प्र. ८४/का. १४५२, दिनांक ३ ऑक्टोबर, १९९५.

शासन निर्णय :

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३७१[२] अन्वये राज्यात विदर्भ, मराठवाडा व उर्वरित महाराष्ट्र यासाठी वैधानिक विकास मंडळांची स्थापना करण्यात आली आहे. वैधानिक विकास मंडळांच्या कामकाजाकरिता वैधानिक विकास मंडळे, राज्यपालांचे सचिवालय व विविध प्रशासकीय विभाग यांच्यामध्ये समन्वय साधण्यासाठी, तसेच मंडळांच्या कार्यक्षेत्रांमध्ये जिल्हानिहाय/विभागनिहाय/विकासक्षेत्रनिहाय झालेला खर्च, विकासाची पातळी यासंबंधीची माहिती तातडीने उपलब्ध करून देता यावी, यासाठी नियोजन विभागामध्ये एक कक्ष स्थापन करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

२. वैधानिक विकास मंडळांच्या कामकाजासाठी नियोजन विभागामध्ये पुढीलप्रमाणे तात्पुरती जादा पदे निर्माण करण्यास शासन मान्यता देत आहे :-

| अ. क्र. | पदाचे नाव | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १) | उप सचिव | रु. ३७००-१२५-४७००-१५०-५००० | १ |
| २) | संशोधन अधिकारी | रु. २०००-६०-२३००-द. रो. ७५-३२००-१००-३५०० | ३ |
| ३) | सहाय्यक | रु. १६४०-६०-२६००-द. रो. ७५-२९०० | १ |
| ४) | लिपिक | रु. ९५०-२०-११५०-द. रो. २५-१५०० | १ |

३. उपरोक्त पदांचा संबंधितांनी कार्यभार स्वीकारल्यापासून ही पदे अस्तित्वात येतील व प्रथमतः ती दिनांक २८ फेब्रुवारी, १९९५ पर्यंत अस्तित्वात राहतील. ही पदे पुढे चालू ठेवण्याचा प्रस्ताव योग्य त्या समर्थनासह जानेवारी १९९५ च्या अखेरपर्यंत शासनास सादर करण्यात यावा.

४. वरील सर्व पदे ही नियोजन विभागाच्या आस्थापनेवर तात्पुरती जादा पदे असतील. या पदांपैकी संशोधन अधिकाऱ्यांची पदे ही अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या संबंधित संवर्गातील असतील.

५. उपरोक्त पदांवरील अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन व भत्ते यावरील मार्च, १९९५ अखेरच्या रु. १.११ लाख एवढया खर्चास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

६. उपरोक्त बाबींवरील मार्च, १९९५ अखेरपर्यंतचा वेतन व भत्त्यावरील होणारा खर्च शासन ज्ञापन वित्त विभाग, क्रमांक :आकनि-११९४/१९८/अर्थसंकल्प-१५, दि. ६-१२-१९९४ - अन्वये आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात आलेल्या रु. १,११,०००[८०००-१९८-७] अग्रिमातून प्रथम भागविण्यात यावा व तो मुख्य लेखाशीर्ष मागणी क्र."ओ-६-३४५१-सेक्रेटरिएट आर्थिक सेवा-०९०, सेक्रेटरीएट [दोन] राज्य नियोजन यंत्रणेत बाद करणे-वैधानिक विकास मंडळे-[योजनांतर्गत][भारित]" [३४५१-०४४-९] या समोर अंतिमत: नोंदविण्यात यावा. आकस्मिकता निधीमधून मंजूर करण्यात आलेली रु. १,११,००० ची तरतूद उपसचिव, नियोजन विभाग [का. १४२२] यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे.

७. आकस्मिकता निधीतून काढलेल्या सदर रकमेचा परतावा करण्यासाठी व १९९४-९५ च्या आर्थिक वर्षातील उर्वरित कालावधीसाठी लागणारा खर्च भागविण्यासाठी आवश्यक असलेल्या रकमेसाठी, तसेच ही बाब विधी मंडळाच्या निदर्शनास आणून देण्यासाठी आवश्यक ती पूरक मागणी मार्च,९५ च्या अधिवेशनात सादर करण्यात यावी.

८. रक्कम खर्ची टाकताना देयकावर "आकस्मिकता निधी अग्रिम शासन ज्ञापन वित्त विभाग, क्रमांक आकनि-११९४/१९८/अर्थ-१५, दि. ६-१२-१९९४ अन्वये मंजूर झाला आहे. "असे लाल शाईने लिहावे.

९. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.प्र.क्र. ८९७ /९४/व्यय-३, दि. १६-११-१९९४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ दि. रा. जवाहिरे ]
अवर सचिव.

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई - ४०० ०३५,
२. राज्यपालांचे परिवार प्रबंधक, राजभवन, मलबार हिल, मुंबई ४०० ०३५.

३. महालेखापाल, [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.

४. महालेखापाल, [महाराष्ट्र [लेखा परीक्षा]मुंबई/नागपूर,

५. वित्त विभाग[व्यय-३/अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-१५], मंत्रालय,

६. नियोजन विभाय, मंत्रालय[का. १४२४], [१४२१][१४२२][१४२३]

७. अधिदान व लेखा अधिकारी, [मुंबई,

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

९. सामान्य प्रशासन विभाग [२५, व १४-अ कार्यासन],

०. अप्पर आयुक्त व सदस्य सचिव, विदर्भ वैधानिक विकास मंडळ द्वारा: विभागीय आयुक्त, नागपूर.

१. अप्पर आयुक्त व सदस्य सचिव, मराठवाडा वैधानिक विकास मंडळ, द्वारा विभागीय आयुक्त, औरंगाबाद.

२. अप्पर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्रासाठीचे वैधानिक विकास मंडळ, द्वारा: विभागीय आयुक्त, कोकण विभाग, मुंबई.

३. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,

४. संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ६ वा मजला, मुंबई,

५. विभागीय आयुक्त, नागपूर/औरंगाबाद/कोकण विभाग, मुंबई.

६. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर, औरंगाबाद,

७. निवड नस्ती.